अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील संशोधन
अधिकारी / सांख्यिकी अधिकारी, गट-ब (राजपत्रित)
संवर्गातील अधिकाऱ्यांच्या मूदतपूर्व बदल्यांबाबत

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः बदली-१०१८/प्र.क्र.३१/का.१४२७**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
विस्तार इमारत, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : १४ जून, २०१८

**शासन आदेश : -**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ चे कलम ४(४) व ४(५) मधील तरतूदीनुसार अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील संशोधन अधिकारी / सांख्यिकी अधिकारी, गट-ब (राजपत्रित) या संवर्गातील खाली नमूद अधिकाऱ्यांची सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने बदली करण्यात येत असून त्यांची पदस्थापना खालील तक्त्यातील स्तंभ क्र. ३ मध्ये दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे :-

| अ. क्र. | अधिकाऱ्यांचे नांव, पदनाम व सध्याचे कार्यालय | बदलीनंतरचे पदनाम व कार्यालय |
|---|---|---|
| (१) | (२) | (३) |
| १ | श्रीमती तृ.कु.निंबाळकर,<br>सहायक जिल्हा नियोजन अधिकारी (मानव विकास), मानव विकास समिती,<br>जिल्हाधिकारी कार्यालय, जिल्हा गोंदिया | जिल्हा सांख्यिकी अधिकारी,<br>जिल्हा सांख्यिकी कार्यालय,<br>जिल्हा सातारा<br>(श्री.श.ना.माळी यांच्या बदलीमुळे रिक्त होणाऱ्या पदी)<br>(विनंतीवरुन) |
| २ | श्री.सं.मो.राठोड,<br>जिल्हा सांख्यिकी अधिकारी,<br>जिल्हा सांख्यिकी कार्यालय,<br>जिल्हा बुलढाणा | सहायक जिल्हा नियोजन अधिकारी,<br>जिल्हा नियोजन समिती,<br>जिल्हाधिकारी कार्यालय,<br>जिल्हा अकोला<br>( श्री.रा.ग.सोनखासकर यांच्या बदलीने रिक्त झालेल्या पदावर) (विनंतीवरुन) |
| ३ | श्रीमती शु.वि.रायते,<br>सहायक जिल्हा नियोजन अधिकारी (मानव विकास),<br>मानव विकास समिती,<br>जिल्हाधिकारी कार्यालय, जिल्हा औरंगाबाद | संशोधन अधिकारी,<br>सहाय्यक संचालक, (राष्ट्रीय नागरी माहिती पध्दती),<br>नगर रचना, जिल्हा पुणे<br>( रिक्त पदावर ) (विनंतीवरुन) |

| अ. क्र. | अधिकाऱ्यांचे नांव, पदनाम व सध्याचे कार्यालय | बदलीनंतरचे पदनाम व कार्यालय |
|---|---|---|
| ४ | श्री.सु.ठ.चिंचाणे,<br>सांख्यिकी अधिकारी (निरीक्षण),<br>प्रादेशिक कार्यालय, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, जिल्हा औरंगाबाद | सांख्यिकी अधिकारी, रानपा (क्षेत्र),<br>मुख्य कार्यालय, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई<br>(रिक्त पदावर) (विनंतीवरुन) |
| ५ | श्रीमती सु.ज.पाटील,<br>जिल्हा सांख्यिकी अधिकारी,<br>जिल्हा सांख्यिकी कार्यालय, जिल्हा जालना | सांख्यिकी अधिकारी,<br>अपर पोलीस महासंचालक (कारागृह), पुणे<br>(रिक्त पदावर) (विनंतीवरुन) |
| ६ | श्री.गि.गं.भिरुड,<br>प्रशासकीय-नि-संशोधन अधिकारी,<br>उर्वरित महाराष्ट्र विकास मंडळ, मुंबई | संशोधन अधिकारी,<br>नगररचना यांचे कार्यालय, (नागरी संशोधन घटक), पुणे<br>( रिक्त पदावर) (विनंतीवरुन) |
| ७ | श्रीमती म.प्र.अहिरराव, संशोधन अधिकारी, राज्य व्यवस्थापन कक्ष, कोकणभवन, नवी मुंबई | सांख्यिकी अधिकारी (नि.), प्रादेशिक कार्यालय, पुणे<br>(रिक्त पदावर) (विनंतीवरुन) |

२. बदली आदेशात बदल करुन घेण्यासाठी प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास तो अधिकारी शिस्तभंगविषयक कारवाईसाठी पात्र ठरेल.

३. संबंधित कार्यालय प्रमुखांनी संबंधित अधिकाऱ्यांच्या पदाचा पदभार अन्य अधिकाऱ्याकडे सोपवून या अधिकाऱ्यांना बदलीच्या पदावर रुजू होण्याकरीता तात्काळ कार्यमुक्त करावे. तसेच बदली केलेल्या पदावर वरील अधिकारी यांना देय / अनुज्ञेय असलेल्या पदग्रहण अवधीत रुजू न झाल्यास संबंधित कार्यालयाने त्यांचे वेतन काढू नये. कोणत्याही परिस्थितीत प्रतिक्षाधीन कालावधी नियमित करण्यात येणार नाही. यासंदर्भात वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक - सेनिवे-१००१/१३०/सेवा-४, दिनांक २/६/२००३ मधील परिशिष्ट-१, नियम क्रमांक ९(१४)(एफ) शेरा क्र.२ नुसार सक्तीचा प्रतिक्षा कालावधी निर्माण होण्यास जबाबदार ठरणाऱ्या सबंधित अधिकाऱ्यावर जबाबदारी निश्चित करण्यात येईल.

४. बदली झालेले अधिकारी बदलीच्या कार्यालयात रुजू झाल्यानंतर त्यांनी तात्काळ संबंधित आहरण व संवितरण अधिकाऱ्याशी संपर्क साधून ई-प्रोफाईल अद्ययावत करण्याची कार्यवाही सात दिवसांच्या आत करावी. अद्यावत केलेले ई-प्रोफाईल संबंधित कार्यालयाने संबंधित अधिकाऱ्यांच्या त्या महिन्याच्या वेतन देयकासोबत कोषागार कार्यालयास सादर केल्याशिवाय त्यांचे वेतन देयक कोषागार कार्यालयाने पारित करु नये. तसेच, अद्ययावत ई-प्रोफाईलच्या प्रती संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई व शासनास पाठविण्यात याव्यात. ई-प्रोफाईल अद्ययावत करण्याची जबाबदारी संबंधित कार्यालय प्रमखांची राहील.

५. काही अधिकारी बदली आदेशाचे पालन करीत नाहीत, त्यामुळे प्रशासकीय कामकाजात अडथळा उत्पन्न होतो असे निदर्शनास आले आहे. यास्तव, वरील अधिकाऱ्यांनी त्यांना देय / अनुज्ञेय असलेल्या पदग्रहण अवधीतच बदलीच्या ठिकाणी रुजू व्हावे. याबाबत दिरंगाई झाल्याचे व शासन आदेशाचा भंग झाल्याचे निदर्शनास आल्यास

संबंधितंविरुध्द शिस्तभंगाची कारवाई करण्यात येईल, याची नोंद घ्यावी.

६. बदली करण्यात आलेल्या अधिकाऱ्यांनी त्यांना कार्यमुक्त केल्याबाबतच्या आणि त्यांनी कार्यभार स्विकारल्याच्या आदेशाची प्रत या विभागास अग्रेषित करावी.

७. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६१४१११०११५८३१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vanita Narayan Jadhav

Digitally signed by Vanita Narayan Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2f0e1884948542877a779b797fc357f1c34d84fe1aa3f9bdc30c060e0431223f, cn=Vanita Narayan Jadhav
Date: 2018.06.14 14:49:55 +05'30'

**( वनिता ना. जाधव )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

संबंधित अधिकारी (मार्फत - अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई)

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१ व २ मुंबई/नागपूर.
२. मा. मुख्यमंत्री/मा. मंत्री (नियोजन)/ मा. राज्यमंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. विभागीय आयुक्त (सर्व)
४. जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय (सर्व)
५. संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
६. सर्व सह सचिव/ उप सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. सहसंचालक, प्रादेशिक कार्यालय, अर्थ व सांख्यिकी संचालनालय (सर्व)
८. उपायुक्त (नियोजन), विभागीय आयुक्त कार्यालय (सर्व).
९. जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन समिती कार्यालय (सर्व)
१०. जिल्हा नियोजन अधिकारी (मानव विकास), मानव विकास समिती, औरंगाबाद
११. जिल्हा सांख्यिकी अधिकारी, जिल्हा सांख्यिकी कार्यालय, जिल्हा सातारा /बुलढाणा/जालना.
१२. संचालक, नगर रचना यांचे कार्यालय (मुल्यनिर्धारण विभाग), मध्यवर्ती इमारत, राष्ट्रीय नागरी माहिती पध्दती, पुणे
१३. अपर पोलीस महासंचालक (कारागृह), अपर पोलीस महासंचालक यांचे कार्यालय, पुणे
१४. सदस्य सचिव, उर्वरित महाराष्ट्र विकास मंडळ, मुंबई
१५. अवर सचिव/ कार्यासन अधिकारी (का.१४२१), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१६. उप सचिव / अवर सचिव, ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१७. अपर मुख्य सचिव (नियोजन), मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक.
१८. लेखा अधिकारी, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई
१९. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालय, जिल्हा गोंदिया/सातारा/बुलढाणा/अकोला/ औरंगाबाद / पुणे/ जालना / ठाणे
२०. अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई
२१. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
२२. निवड नस्ती.